## महाराष्ट्र शासन

**क्रमांक :- अप्रदा- १७२३/ प्र.क्र.१७३/१३स,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
मंत्रालय, विस्तार इमारत,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २३ ऑगस्ट, २०२३.

संदर्भ :-१. शासनाचा क्रमांक:- संकीर्ण- १२२३/ प्र.क्र.१३२/१३स, दिनांक २८ जून,२०२३ रोजीचा आदेश.
२.श्री.जयंत पाटील, वि.प.स. यांचे दिनांक ३०.०८.२०२३ रोजीचे पत्र.
३.राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. रासनिप्रा/ कक्ष-११/ रायगड जिमस बँक/ निवडणूक/ ५६३०/२०२३, दिनांक ०९.०८.२०२३ रोजीचे पत्र.

### आदेश

ज्याअर्थी, राज्यात ३० जून नंतर पर्जन्यमानाचे स्वरूप जास्त असल्याने उद्भवणारी नैसर्गिक आपत्ती, पावसामुळे जनजीवन व वाहतूक व्यवस्था विस्कळीत होण्याची शक्यता तसेच, सदर परिस्थिती पूर्वपदावर येण्यास लागणारा कालावधी विचारात घेता जास्तीत जास्त मतदारांना निवडणूकीमध्ये सहभाग नोंदवता यावा यासाठी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम १५७ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतूदीला सुट देवून २५० किंवा त्यापेक्षा कमी सदस्य संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्था तसेच, ज्याप्रकरणी मा.सर्वोच्च / मा.उच्च न्यायालयाने निवडणूक घेण्याचे आदेशीत केले आहे अशा सहकारी संस्था वगळून तसेच, ज्या सहकारी संस्थांची निवडणूक प्रक्रिया पुर्ण झाली आहे परंतु, अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची निवड होणे बाकी आहे अशा संस्था वगळून, राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका या आदेशाच्या दिनांकापासून ज्या टप्प्यावर असतील त्या टप्प्यावर दिनांक ३० सप्टेंबर, २०२३ पर्यंत संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदेशान्वये पुढे ढकलण्यात आल्या आहेत,

ज्याअर्थी, रायगड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि.अलिबाग या बँकेच्या संचालक मंडळाच्या निवडणूकीत निवडणूक लढविण्यासाठीच्या एकूण जागांची संख्या २१ असून त्यासाठी २७ उमेदवारांचे अर्ज प्राप्त झाले असून ०३ उमेदवारांनी अर्ज मागे घेतल्याने २४ अर्ज शिल्लक आहेत. त्यापैकी बँकेस संलग्न असलेल्या इतर सहकारी संस्था, दुग्ध सहकारी संस्था, पशुपैदास संस्था, वराह पालन, कुक्कुटपालन, शेळी मेंढी पालन सहकारी संस्था, पाणी पुरवठा संस्था, शेंग उत्पादक

संस्था, कृषि पणन संस्था, शेतमाल प्रक्रिया संस्था, भाजीपाला सहकारी संस्था, खरेदी विक्री संघ, सहकारी साखर कारखाने, ऑईल मिल्स, सुतगिरण्या मतदार संघातील १ जागेसाठी २ अर्ज शिल्लक असून महिला राखीव मतदार संघातील २ जागेसाठी ४ अर्ज शिल्लक आहेत. निवडणूक लढविण्यासाठीच्या २१ जागांपैकी इतर सहकारी संस्थांसाठीची १ जागा व महिला राखीव मतदार संघातील २ जागा अशा ३ जागा वगळल्यानंतर १८ जागांवर प्रत्येकी एका जागेसाठी एक याप्रमाणे १८ उमेदवारांचे नामनिर्देशन पत्र शिल्लक राहिले असल्याने सदर जागांसाठी बिनविरोध निवडून येण्याची शक्यता आहे,

त्याअर्थी, निवडणूक लढविण्यासाठीच्या २१ जागांपैकी १८ जागांसाठी बिनविरोध निवडणूक होण्याची शक्यता व केवळ ३ जागांसाठी निवडणूक बाकी असल्याची बाब विचारात घेता रायगड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि., अलिबाग या बँकेचा उर्वरित निवडणूक कार्यक्रम चालू ठेवण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८२३१५५१५०४२०२ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.08.23 15:54:49 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था, कोकण.
४. जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था रायगड.
५. निवडनस्ती, कार्यासन १३-स.